विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) या संवर्गातून अधिक्षक अभियंता, गट-अ (राजपत्रित) या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**

**शासन आदेश क्रमांक- मुविनि-२०२२/प्र.क्र.१२७/ऊर्जा-१**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई.

दिनांक: ०१ जुलै, २०२४.

**शासन आदेश:-**

ऊर्जा विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) या संवर्गातून अधिक्षक अभियंता, गट-अ (राजपत्रित) या पदावर पदोन्नतीसाठीच्या सन २०२३-२४ च्या निवडसूचीमध्ये ज्येष्ठतेनुसार, खालील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) (वेतनश्रेणी एस-२३: ६७७००-२०८७००) यांना अधिक्षक अभियंता, गट-अ (राजपत्रित) (वेतनश्रेणी एस-२५: ७८८००-२०९२००) पदावर या आदेशान्वये विहित अटींच्या अधिन निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून पदोन्नती नंतर **अधिक्षक अभियंता, गट-अ (राजपत्रित)** म्हणून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर **स्तंभ-६** मध्ये दर्शविण्यात आलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ. क्र. | ज्येष्ठता क्र. | अधिकाऱ्याचे नाव | अधिकाऱ्याचा स्वत: चा प्रवर्ग | सध्याची पदस्थापना | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | १ | श्री. उदयकुमार भोयर | इ.मा.व. | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, गोंदिया. | अधिक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, नागपूर. |
| २ | २ | श्री. हेमंत गांगुर्डे | अ.ज. | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, नंदुरबार. | अधिक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, पुणे. |

२. वर नमूद विद्युत निरीक्षक यांची सदर पदोन्नती व पदस्थापना पुढे नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरूपात करण्यात येत आहे.

(१) सदर पदोन्नती मा. सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ मधील अंतिम निर्णयास अधीन राहून तसेच रिट पिटीशन स्टँप नं. १०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टँप नं. १०८७८/२०२१ मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि. २५.०५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दि. ०७/०५/२०२१ मधील तरतुदीनुसार पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि. २५/०५/२००४ च्या स्थितीनुसार निव्वळ तात्पुरत्या

स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा. सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णयाच्या अधीन राहून भरण्यात येत आहेत.

(२) सदर पदोन्नती मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर येथे ज्येष्ठतासूचीसंदर्भात प्रलंबित असलेल्या प्रकरणातील (मूळ अर्ज क्र. १३१७/२०२३) मध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

(३) सदर अधिकाऱ्यांना देण्यात आलेली निव्वळ तात्पुरती पदोन्नती कोणतीही पूर्व सूचना वा नोटिस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवित आहे.

(४) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

(५) सदर अधिकाऱ्यांना देण्यात येणारी निव्वळ तात्पुरती पदोन्नती ही त्यांच्याविरुध्द आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी/ फौजदारी प्रकरण सुरु झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

(६) सदर अधिकाऱ्याने विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) या पदावरील तात्पुरती पदोन्नती न स्विकारल्यास शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३०/कार्या-१२, दिनांक १२/०९/२०१६ मधील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात येईल.

३. मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांना कळविण्यात येत की, त्यांनी सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या नवीन नियुक्तीच्या जागी रूजू होता यावे म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करून पदमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्याच्या सूचना द्याव्यात. तसेच, संबंधित अधिकाऱ्यांना पदोन्नतीने पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास pradip.bhintade@nic.in या ई-मेल पत्त्यावर त्वरित अवगत करावे.

४. मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांना कळविण्यात येत की, सदर पदोन्नतीने रिक्त होणाऱ्या पदांचा अतिरिक्त कार्यभार देण्याबाबतचा प्रस्ताव आपल्या शिफारशीसह शासनास **तात्काळ** सादर करावा.

५. संबंधित अधिकाऱ्यांना कमीत कमी पदग्रहण अवधी घेऊन नव्या पदाचा पदभार स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. सदर अधिकारी पदोन्नतीने पदस्थापनेच्या पदावर या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या विहीत मुदतीत रुजू न झाल्यास त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा **अकार्यदिन (dies non)** म्हणून गणला जाईल. तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम-२३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

६. मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर अधिकाऱ्यांनी पदभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास pradip.bhintade@nic.in या ई-मेल पत्त्यावर कळवावा. विहीत कालावधीत ते रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणेकरुन संबंधितांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार त्यांचा रजा अर्ज स्वीकारु नये / मंजूर करु नये.

७. संबंधित अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदावर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतननिश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प विहित मुदतीत न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११ (१) (ए) अनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेवून करण्यात यावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०७०११५३८४२९५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADIP DATTATRAY BHINTADE

Digitally signed by PRADIP DATTATRAY BHINTADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=148166d6ba6b6b7506a6c02726418297ae7252d6770d6eeda6fcf82676c59eb5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=70AB5B7C0DEE32FCEE54C2D940368CB9D34A7AEDC3404176B7D9B0082921CFF0, cn=PRADIP DATTATRAY BHINTADE
Date: 2024.07.01 15:54:54 +05'30'

**( प्रदिप भिंताडे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री तथा मा. मंत्री (ऊर्जा) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उपमुख्यमंत्री तथा मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद/ विधानसभा, विधानभवन, मुंबई.
७. सर्व मा. संसद सदस्य/ विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. उपसचिव (ऊर्जा-१), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर.
१३. मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, प्रशासकीय इमारत, तिसरा मजला, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर, मुंबई-४०००७१.
१४. लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई.
१५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१६. अधीक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत निरीक्षक मंडळ, मुंबई/पुणे/ छ. संभाजीनगर/नागपूर.
१७. विद्युत निरीक्षक, निरीक्षक विभाग, गोंदिया/ नंदुरबार. (**द्वारा**: मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई.)
१८. निवडनस्ती (ऊर्जा-१).